कोरडीनाला मध्यम प्रकल्प ता.नवापूर जि.नंदुरबार प्रकल्पास चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१७/१०६०/(प्र.क्र.३३५/१७)/मप्र**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० फेब्रुवारी, २०२३.

**संदर्भ** :- कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव, यांचे पत्र जा.क्र.कास/तापाविम/प्रशा-२/४६८७/२०१७ दि.०३/१०/२०१७.

**प्रस्तावना :-**

कोरडी नाला मध्यम प्रकल्प,ता. नवापूर. जि.नंदुरबार येथे कोरडी नदीवर असून ११.४९ दलघमी क्षमतेचे मातीधरण बांधण्यात आलेले आहे. प्रकल्पाचे माती धरण, सांडवा, विमोचकाची कामे १००% पुर्ण झालेली असून प्रकल्पाची घळभरणी सन २०११ मध्ये पूर्ण करण्यात आली होती. प्रकल्पांतर्गत सिंचन प्रणालीची ९०% कामे पूर्ण करण्यात आलेली आहेत. या प्रकल्पांतर्गत आदिवासी भागातील ३६५९ हे.आर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.

कोरडीनाला मध्यम प्रकल्प,ता. नवापूर. जि.नंदुरबार या प्रकल्पास शासन निर्णय क्र. आर/आर/१०८१/८८/(२५१३)/जसंअ-२, मंत्रालय,मुंबई दिनांक-३१.१०.१९८१ अन्वये सन १९८०-८१ चे दरसुची वर आधारीत रुपये २.७१ कोटी (रुपये दोन कोटी एकाहत्तर लक्ष फक्त) रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. प्रकल्पास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता महामंडळ निर्णय क्र. तापाविमं/मु.अ./कोरडी/ता.३/मप्र./सुप्रमा/१२७९/९९, दि. ३१.०३.१९९९ अन्वये सन १९९८-९९ चे दरसुची वर आधारीत रुपये १८.९० कोटी (अठरा कोटी नव्वद लक्ष रूपये) किंमतीस प्रदान करण्यात आली.

तसेच व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक कोरडी/ २०/०६/१०१३/(२७७/२००६)/म.प्र. दि.१३.०९.२००७ अन्वये सन २००५-०६ चे दरसुची वर आधारीत रुपये ४७.१७ कोटी (अक्षरी सत्तेचाळीस कोटी सतरा लक्ष रूपये मात्र) किंमतीस मान्यता प्रदान करण्यात आली. तसेच तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता निर्णय क्रमांक कोरडीनाला/१००८/१७/(८/२०१०)/म.प्र. दि.१८.०३.२०१० अन्वये सन २००९-१० चे दरसुची वर आधारीत रूपये ११७.०९ कोटी (एकशे सतरा कोटी नऊ लक्ष रूपये मात्र) किंमतीस प्रदान करण्यात आली होती.

दरम्यानच्या काळात दरसुचीतील बदलामुळे, भुसंपादन किंमतीतील वाढ, जादा दराची निविदा स्विकृतीमुळे झालेली वाढ, संकल्प चित्रातील बदलांमुळे झालेली वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ़, अनुषंगिक खर्चात झालेली वाढ इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ

झाल्यामुळे कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी सन २०१६-१७ च्या दरसुचीवर आधारीत रुपये १६९.१४ कोटी किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदर प्रकल्पाची तृतीय प्रशासकीय मान्यता किंमत रुपये ११७.०९ कोटी असुन चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रुपये १६९.१४ कोटीच्या तुलनेत रुपये ५२.०५ कोटीने जास्त आहे. किंमत वाढीची प्रमुख कारणे पुढील प्रमाणे आहेत :-

| **अ.क्र** | **वाढीचे कारणे** | **वाढ** |
|---|---|---|
| (१) | दरसूचीतील बदलामुळे | १६.०७ |
| (२) | जास्त दराची निविदा स्वीकारल्याने झालेली वाढ | १.७१ |
| (३) | संकल्पचित्रातील बदल व कामाच्या व्याप्तीतील बदल | - |
| (४) | भूसंपादन किंमतीतील वाढ | ४.२८ |
| (५) | अपुऱ्या तरतुदीमुळे झालेली वाढ | ४३.२६ |
| (६) | इतर कारणामुळे झालेली वाढ | २.१७ |
| (७) | अनुषंगिक खर्च | -१५.४४ |
| | **एकुण :-** | **५२.०५** |

प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.०४ इतके आहे. (मापदंड १.५ पेक्षा जास्त) प्रकल्प मापदंडात बसत नाही. प्रकल्पाचा आर्थिक परतावा दर (ERR) १०.२८ आहे.

प्रकल्पाचा संकल्पित एकुण पाणीसाठा ११.४९ द.ल.घ.मी. असुन एकुण पाणी वापर १०.७५ द.ल.घ.मी. इतका आहे. नंदुरबार जिल्हयामधील नवापूर तालुक्यातील १८ गावामधील ३६५९ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.

या प्रकल्पाच्या चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत चा रु.१६९.१४ कोटी (दरसुची २०१६-१७) किंमतीचा छाननी अहवाल राज्य तांत्रिक सल्लागार समिति-१ (SLTAC-I) च्या दि.२६/०५/२०१७ रोजी झालेल्या १०२ व्या बैठकीमध्ये अंतिम करण्यात आला. तद्‌नंतर सदर प्रस्ताव दि. २४/०२/२०२१ रोजीच्या नियोजन व वित्त मंत्री स्तरावरील व्यय अगक्रम समितीसमोर सादर करण्यात आला होता व समितीने सदर प्रस्ताव हा मा. मंत्रीमंडळासमोर निर्णयार्थ सादर करण्यास सहमती दिली.

त्यानुसार दिनांक-२९/११/२०२२ रोजीच्या मा.मंत्रीमंडळ बैठकीत सदर प्रस्ताव निर्णयार्थ सादर करण्यात आला. मा.मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन कोरडी मध्मय प्रकल्पास सन २०१६-१७ दरसुची वर आधारित रुपये १६९.१४ कोटी किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. शासनाच्या या निर्णयाव्दारे कोरडी मध्यम प्रकल्पास सन २०१६-१७ दरसुचीवर आधारित रुपये १६९.१४ कोटी (रुपये एकशे एकोणसत्तर कोटी चौदा लक्ष फक्त) किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशा़सकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये १६३.३१ कोटी (रुपये एकशे त्रेसष्ट कोटी एकतीस लक्ष फक्त) मध्ये कामा प्रित्यर्थ, आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी रुपये ५.८३ कोटी (रुपये पाच कोटी त्रऐशी लक्ष फक्त) तरतुद आहे. उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवही मध्ये अनुक्रमांक ०३/२०२३ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प या वरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०२) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१-एच ७६३) कोरडी नाला मध्यम प्रकल्प या शिर्षाखाली टाकावा व मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. सदर चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहुन देण्यात येत आहे.

५.१) राज्य स्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्दा क्रमांक २७ (२) मधील निरीक्षणांची पुर्तता करावी.

५.२) सर्व वैधानिक मान्यता प्राप्त केल्याखेरीज काम सुरु करु नये.

५.३) नलिका वितरण प्रणालीचे संकल्पन मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना कडुन तपासुन घ्यावे तदनंतर नलिका वितरण अथवा खुला कालवा या पर्यायांपैकी किफायतशीर पर्याय कार्यकारी संचालक यांनी प्रमाणित करुन निवडावा.

५.४) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यते शिवाय प्रकल्पात समावेश करु नये. तसेच यापुढे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ होणार नाहीत, याची दक्षता घ्यावी.

५.५) प्रकल्पाची कामे जुन २०२४ पर्यंत व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावीत.

५.६) पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशा प्रकारे कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे / निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५.७) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५.८) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोर पणे अंमलबजावणी करण्यात यावी.

५.९) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्विती करणाच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

५.१०) या योजनेबाबत चालु असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पुढे चालु ठेवावी. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

५.११) या योजनेवर झालेल्या ज्यादा खर्चास संबंधितांवर जबाबदारी निश्चितीची कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक२०/२०२०/का.१४३४ दिनांक-१२/०३/२०२०, वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७२/२०२०/का.व्यय-१२ दिनांक-१७/०३/२०२०, व मा. मंत्री मंडळाच्या दिनांक-२९/११/२०२२ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०२२०१६२१२५३१२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH SHRIRAM KALE

Digitally signed by RAJESH SHRIRAM KALE
DN: CN = RAJESH SHRIRAM KALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCE DEPARTMENT
Date: 2023.02.20 16:25:08 +05'30'

**( राजेश काळे )**
शासनाचे अवर सचिव

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
१६) उप सचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
१८) कार्यकारी अभियंता, नंदुरबार मध्यम प्रकल्प विभाग, नंदुरबार.
१९) वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

उप शिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा
कोरडी मध्यम प्रकल्प ता.नवापूर जि.नंदुरबार
शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१७/(प्र.क्र.३३५/१७)/मध्यम प्रकल्प
दिनांक :- २० फेब्रुवारी, २०२३ चे सहपत्र.

**(किंमत रुपये कोटी)**

| अ.क्र. | उपशिर्ष | तृतीय सु.प्र.मा. नुसार | चतुर्थ सु.प्र.मा. नुसार | वाढ / घट (+/-) |
|---|---|---|---|---|
| **(अ)** | **I – शिर्षकामे** | | | |
| १ | ए – प्राथमिक | ०.०१० | ०.१५ | ०.१४ |
| २ | बी – भुसंपादन | १०.४२ | १३.०९ | २.६७ |
| ३ | सी – मुख्य कामे | ५९.८५ | ६३.३७ | ३.५२ |
| ४ | डी – मुख्य विमोचक | ४.८७ | ३.६२ | -१.२५ |
| ५ | के – ईमारती | ०.०४३ | ०.०४५ | ०.००२ |
| ६ | एम – वृक्षारोपण | ०.०१८ | ०.०५६ | ०.०३८ |
| ७ | ओ – संकीर्ण | ०.१९ | १.६१ | १.४२ |
| ८ | पी – देखभाल | ०.५० | ०.६८ | ०.१८ |
| ९ | आर – दळणवळण | ०.११ | ०.८४ | ०.७३ |
| **एकुण कामाप्रित्यर्थ** | | **७६.१०** | **८३.४७** | **२८९.६८** |
| | **अनुषंगिक कामे** | **१३.९५** | **३.६१** | **-१०.३४** |
| **एकूण शिर्ष कामे (अ)** | | **९०.०६** | **८७.०८** | **-२.९८** |
| **(ब)** | **II – कालवा कामे** | | | |
| १ | ए – प्राथमिक | ०.२७ | ०.३४ | ०.०७ |
| २ | बी – भुसंपादन | १.३० | ५.०२ | ३.७२ |
| ३ | सी – मुख्य कामे | ०.२६ | ०.२८ | ०.०२ |
| ४ | डी – मुख्य विमोचक | ०.५५ | ०.६६ | ०.११ |
| ५ | ई-प्रपात | ०.०४ | ०.०३२ | -०.००८ |
| ६ | एफ – आर एच टी वर्क्स | ०.९१ | ९.८९ | ८.९८ |

| अ.क्र. | उपशिर्ष | तृतीय सु.प्र.मा. नुसार | चतुर्थ सु.प्र.मा. नुसार | वाढ / घट (+/-) |
|---|---|---|---|---|
| ७ | जी - पुल | २.५७ | ३.७६ | १.१९ |
| ८ | एच - अतिवाहक | ०.०६ | ०.६० | ०.५४ |
| ९ | के - ईमारती | ०.३७ | ० | -०.३७ |
| १० | एल - मातीकाम | २.९९ | ११.५० | ८.५१ |
| ११ | एम - वृक्षरोपण | ०.०४ | ० | -०.०४ |
| १२ | ओ - संकीर्ण | ०.३१ | ० | -०.३१ |
| १३ | पी - देखभाल | ०.०७ | ०.६५ | ०.५८ |
| १४ | क्यु- हत्यारे व अवजारे | ०.०८ | ० | -०.०८ |
| १५ | आर - दळणवळण | ०.११ | ० | -०.११ |
| १६ | यु - वितरीका | ९.१४ | ४०.५८ | ३१.४४ |
| १७ | शेतचाऱ्या व निचरा कामे | ०.४४ | ६.३२ | ५.८८ |
| | **एकुण (ब):** | **१९.५२** | **७९.६५** | **६०.१३** |
| | **एकुण (१+२):** | **९५.६२** | **१६३.११** | **६७.४९** |
| | अनुषंगिक खर्च | **२१.४७** | **६.०३** | **-१५.४४** |
| | **एकुण किंमत:** | **११७.०९** | **१६९.१४** | **५२.०५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) ३६५९ हेक्टर आहे.

ब) लाभव्यय गुणोत्तर - १.०४ < १.५०

क) आर्थिक परतावा दर (ERR) - १०.२८

RAJESH SHRIRAM KALE

Digitally signed by RAJESH SHRIRAM KALE
DN: CN = RAJESH SHRIRAM KALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCE DEPARTMENT
Date: 2023.02.20 16:25:32 +05'30'

**( राजेश काळे )**

शासनाचे अवर सचिव